**सच्चर समितीने केलेल्या शिफारशींची प्रभावी अंमलबजावणी. विविध विभागामार्फत पदभरतीकरिता देण्यात आलेली जाहिरात त्या-त्या विभागाच्या संकेतस्थळावर ( website ) उपलब्ध केल्यानंतर ती अल्पसंख्यांक विकास विभागाच्या "रोजगार" या संकेताशी जोडणेबाबत** ( to link with "career" ).

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः सच्चर-२०१४/प्र.क्र.१५४/का.८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: ६ जानेवारी, २०१५.

वाचा -
**शासन परिपत्रक क्रमांकः** अल्पसंख्यांक विकास विभाग, क्र. सच्चर-२०१२/प्र.क्र.४५/का.८,
दि.०४ एप्रिल, २०१४.

**शासन परिपत्रक -**

केंद्र शासनाने मुस्लिम समाजाच्या सामाजिक, आर्थिक व शैक्षणिक स्थितीबाबतचा अभ्यास करुन शिफारशी करण्यासाठी नेमलेल्या न्या. सच्चर यांच्या समितीच्या अहवालामधील शिफारशी तसेच केंद्र शासनामार्फत या संदर्भाने प्राप्त सूचना/निदेश / पत्रव्यवहार यासंबंधी विभागाकडून केलेली कार्यवाही संबंधित विभागांनी त्यांच्या संकेतस्थळावर ( website ) स्वतंत्र शिर्षकाखाली उपलब्ध करुन वेळोवेळी ती अद्यावत करावी, अशा सूचना दिनांक ०४ एप्रिल, २०१४ रोजीच्या परिपत्रकान्वये सर्व विभागांना देण्यात आल्या आहेत.

तसेच शासकीय भरतीमध्ये अल्पसंख्यांकाचा समावेश वाढविणेकरिता सर्व विभागांनी त्यांच्या भरतीसंबंधीच्या जाहिराती ज्याप्रमाणे रोजगार व स्वयंरोजगार विभागाच्या संकेतस्थळावर प्रसिद्ध केल्या जातात त्याप्रमाणे अल्पसंख्याक विकास विभागाच्या वेबसाईटवरही प्रसिद्ध करावयाच्या आहेत. त्याकरिता प्रत्येक विभागाने त्यांच्या वेबसाईटवर टाकलेल्या जाहिराती www.maharashtra.gov.in येथील अल्पसंख्याक विकास विभागाच्या संकेतस्थळावरील "जलद दुवे " या भागात "रोजगार " याच्याशी शी link करावी. जेणेकरुन ती जाहिरात अल्पसंख्याक विकास विभागाच्या वेबसाईटवरुनही पाहता येईल. सदर जाहिरात ही ज्या विभागाची असेल तो विभाग त्या जाहिरातींशी संबंधित कोणत्याही बाबीस अनुसरुन जबाबदार राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१०७११०१२७९२१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Samir Ramesh Salunkhe

Digitally signed by Samir Ramesh Salunkhe
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Samir Ramesh Salunkhe
Date: 2015.01.07 11:08:50 +05'30'

**( समीर साळुंखे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.

२) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव , सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.